**शासनाचे आर्थिक नुकसान व अवमानना टाळण्यासाठी न्यायालयीन प्रकरणे गांभीर्याने हाताळण्याबाबत-**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- विधी-२०१७/प्र.क्र.१४/विधी कक्ष**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०५ ऑगस्ट, २०१७

ग्राम विकास व जलसंधारण विभाग व विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयाशी संबंधित मा.न्यायालयांमध्ये प्रलंबित न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्या विरुध्द न्याय निर्णय दिले जात असल्याचे तसेच अनेक प्रकरणांमध्ये अवमानना याचिका दाखल होत असल्याचे दिसुन येते.

२. शासनाच्या वतीने प्रतिज्ञापत्र दाखल करण्यासाठी, तसेच संबंधित शासकीय अभियोक्ताशी वेळोवेळी संपर्क साधून शासनाची बाजू मांडण्यासाठी आवश्यक माहिती व कागदपत्रे उपलब्ध करुन देणे, व सुनावणीच्या वेळी न्यायालयात उपस्थित राहण्यासाठी उप आयुक्त आस्थापना तसेच उप आयुक्त विकास यांना प्राधिकृत करण्यात येते. तथापि, असे निर्देशनास आले आहे की, मा. न्यायालयामध्ये प्रलंबित असलेल्या प्रकरणाच्या सुनावणीच्या वेळी शासनाच्या वतीने प्राधिकृत करण्यात आलेले अधिकारी व्यक्तीश: उपस्थित न राहता त्यांच्या वतीने कनिष्ठ कर्मचारी उपस्थित राहतात. तसेच शासनातर्फे धोरणात्मक बाबींसंदर्भातील व अतिशय महत्वाच्या न्यायालयीन प्रकरणात सह सचिव/उप सचिव/ क्षेत्रिय कार्यालयांतील जबाबदार वरिष्ठ अधिकारी उपस्थित राहत नसल्यामुळे शासनाची बाजु भक्कमपणे न्यायालयासमोर मांडली न गेल्यामुळे अशा प्रकरणाचा निकाल शासनाच्या विरोधात जातो. तसेच अनेक प्रकरणात शासनाची बाजू प्रभावीपणे न मांडता आल्यामुळे शासनाला नाहक मोठा आर्थिक भुर्दंड सहन करावा लागतो.

३. उपरोक्त परिस्थिती विचारात घेता शासनस्तरावर, सह सचिव/उप सचिव तसेच सर्व क्षेत्रीय कार्यालय प्रमुख, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना खालीलप्रमाणे सक्त सुचना देण्यात येत आहेत.

I. विविध न्यायालयीन प्रकरणी शासनाची बाजू मांडण्यासाठी तसेच शासनाच्यावतीने शपथपत्र दाखल करणे व प्रकरण हाताळण्यासाठी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्यावर सोपविलेली जबाबदारी न चुकता पार पाडावी.

II. शासनाच्यावतीने प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांनी मा.उच्च न्यायालयात सुनावणीच्या वेळी प्रत्यक्ष उपस्थित राहून शासकीय अभियोक्तांना संबंधित न्यायालयीन प्रकरणाची आवश्यक असणारी माहिती व कागदपत्रे वेळीच उपलब्ध करुन दयावी. कोणत्याही परिस्थितीत कनिष्ठ अधिकारी/कर्मचाऱ्यांवर सदरची जबाबदारी सोपविण्यात येऊ नये.

III. शासनाच्या धोरणात्मक बाबींना मा.उच्च न्यायालयात आव्हानीत केले असल्यास विषयाशी संबंधीत सह सचिव/उप सचिव यांनी त्यांच्या स्तरावरुन सर्व बाबीचे क्षेत्रीय अधिकाऱ्यांना मार्गदर्शन करावे.

IV. सर्व सह सचिव/ उप सचिव यांनी मा. सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय व इतर न्यायालयात दाखल असलेल्या न्यायालयीन याचिकेची त्यांच्या अधिनस्त कार्यासनांकडून दर महिन्याच्या २० तारखेपर्यंत सर्व माहिती एकत्रीतपणे विधी कक्षास सादर करण्यात यावी.

सर्व सह सचिव/उप सचिव/उप आयुक्त आस्थापना व विकास तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी मा.सर्वोच्य न्यायालयात तसेच उच्च न्यायालय/कनिष्ट न्यायालय यांनी पारित केलेल्या आदेशाची अंमलबजावणी त्वरीत व विहीत कालावधीत करण्यात यावी. मा. न्यायालयाचा निर्णय न्याय/ संयुक्तीक वाटत नसल्यास मा.सर्वोच्च न्यायालय किंवा उच्च न्यायालयात अशा आदेशाविरुध्द विहीत मुदतीत विशेष अनुमती याचिका किंवा अपिल दाखल करण्याची कार्यवाही करावी.

V. मात्र वरील दोन्ही प्रकारची कारवाई विहित मुदतीत न केल्यामुळे मा.न्यायालयात अवमान याचिका दाखल होतात. त्यामध्ये विभागाच्या सचिवांना / प्रधान सचिवांना प्रतिवादी केले जाते. सर्व सह सचिव/उप सचिव, उप आयुक्त आस्थापना विकास व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद यांनी न्यायालयीन प्रकरणे गांभिर्याने हाताळावी व अशा प्रकारच्या प्रकरणामध्ये शासनास होणारे आर्थिक नुकसान व मानहानी टाळण्यासाठी उपरोक्त सुचनाचे काटेकोरपणे पालन होईल याची संबंधित अधिकाऱ्यांनी दक्षता घेण्यात यावी.

उपरोक्त सुचनांचे काटेकोरपणे पालन न करता कर्तव्यात कसुर केल्यामुळे एखादया प्रकरणी शासनास आर्थिक भुर्दंड सहन करावा लागल्यास अथवा मा.न्यायालयाची अवमानना होऊन मा.न्यायालयाने दंडात्मक कार्यवाही केल्यास संबंधीत अधिकाऱ्यांस व्यक्तीशः जबाबदार धरुन आर्थिक नुकसानीची जबाबदारी निश्चित केली जाईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०८१११४४८०९७६२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aseem Gupta

Digitally signed by Aseem Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Gupta
Date: 2017.08.22 14:18:48 +05'30'

(असीम गुप्ता)
सचिव,
ग्राम विकास व पंचायत राज विभाग

**प्रत-**

१) सचिव, (ग्राम विकास व पंचायत राज),ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे समन्वय अधिकारी.

२) सचिव, (ज.सं.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे स्वीय सहायक.
३) सचिव (प्र.मं.ग्रा.स.यो), ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे स्वीय सहायक.
४) सर्व विभागीय आयुक्त
५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
६) सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
७) सर्व सह/उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
८) सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
९) कक्ष अधिकारी,माहिती तंत्रज्ञान कक्ष, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१०) निवडनस्ती विधी कक्ष, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.